सन २०१४-१५ मध्ये कोरडवाहू शेतीच्या
स्थैर्यासाठी तरतूद करणे कार्यक्रम
राबविण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-२०१४/प्र.क्र.८३/१४/२अे**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
तारीख: **३०/०७/२०१४**

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-२०११/प्र.क्र.४३/११/(भाग-४)/२अे, दि.१२ मार्च,२०१४**
२) **शासन निर्णय क्रमांकः कोशेअ-२०१४/प्र.क्र.८२/१४/२अे, दिनांक १६.५.२०१४**
३) **वित्त विभागाचे क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३,दिनांक १.७.२०१४ चे परिपत्रक**

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाने उपरोक्त संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये कोरडवाहू शेती अभियान अंतर्गत विविध योजनांचा समन्वय करुन (Convergence) सन २०१४-१५ ते २०१८-१९ या कालावधीत रु.२०,००० कोटीचा कार्यक्रम राबविण्यास तसेच त्यापैकी रु.२००० कोटी तरतूद कोरडवाहू शेती अभियान योजनेस स्वतंत्ररित्या उपलब्ध करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने कोरडवाहू शेती अभियान (Dryland Farming Mission) कार्यक्रम सन २०१४-१५ मध्ये राबविण्यास संदर्भ क्र.२ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सन २०१४-१५ करिता राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे ही योजना राबविण्यास तसेच त्यासाठी करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीत तरतूद रु.९५.७२ कोटी मधील रु.२५.०० कोटी रकमेच्या कार्यक्रमास संदर्भ क्र.२ अन्वये वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. सन २०१४ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये सदर योजनेस रु.५४.२८ कोटीची तरतूद पूरक मागणीव्दारे करण्यात आली आहे. त्यानुसार सन २०१४-१५ करिता कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे या योजनेस आता एकूण रु.१५०००.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद झालेली आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकानुसार सन २०१४-१५ मध्ये कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे (२४०१९२५१) योजना राबविण्याकरिता एकूण अर्थसंकल्पीय तरतूद

रु.१५०००.०० लाख (रु.९५.७२ कोटी + रु.५४.२८ कोटी) पैकी लेखानुदानान्वये वितरीत केलेली तरतूद रु.२५००.०० लाख वजा जाता उर्वरित रु.६५००.०० लाख (६०% मर्यादेत) रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

कोरडवाहू शेती अभियान अंतर्गत मनुष्यबळ विकास, संरक्षित सिंचन सुविधा, यांत्रिकीकरण, कोरडवाहू पीकांच्या सुधारित वाणांची प्रात्यक्षिके, संरक्षित शेती, प्राथमिक कृषि प्रक्रिया व पणन इ. घटकांचा वापर करुन सन २०१४-१५ ते सन २०१८-१९ या कालावधीत रु.२०००० कोटीचा कार्यक्रम राबविण्यास तसेच त्यापैकी रु.२००० कोटी तरतूद कोरडवाहू शेती अभियान योजनेस स्वतंत्ररित्या उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्रमांक १ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सन २०१४-१५ मध्ये कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे (२४०१९२५१) योजना राबविण्याकरिता एकूण अर्थसंकल्पीय तरतूद रु.१५०००.०० लाख (रु.९५.७२ कोटी + रु.५४.२८ कोटी) पैकी लेखानुदानान्वये वितरीत केलेली तरतूद रु.२५००.०० लाख वजा जाता उर्वरित रु.६५००.०० लाख (६०% मर्यादेत) रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येवून खालील लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.डी-३**
**२४०१-पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण,**
**(०१)(५०) राज्यातील कोरडवाहू शेतीच्या स्थैर्यासाठी तरतूद करणे**
**(२४०१ ९२५१) योजनांतर्गत (दत्तमत)**
**३३-अर्थसहाय्य"**

३. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सदर अभियानासाठी वरील निधी खर्च करण्यास आहरण व संवितरण अधिकारी राज्य नोडल अधिकारी म्हणून घोषित करणेत येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यासही त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. अभियान राबविण्याकरिता येणारा प्रशासकीय व संकीर्ण खर्च एकूण कार्यक्रमाच्या २ टक्के निधीतून भागविण्यात यावा.

५. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१४८/१४३१, दिनांक ११.७.२०१४ व वित्त विभागाचे अनौ.संदर्भ क्र.१४/७, दिनांक २५.७.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201407301645283601 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2014.07.31 12:28:05 +05'30'

**( उ. म. मदन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२. मा. मंत्री (फलोत्पादन ) यांचे खाजगी सचिव
३. मा. मंत्री (जलसंधारण ) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (सहकार ) यांचे खाजगी सचिव
५. मा. मंत्री (ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
६. मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
८. मा.राज्यमंत्री (फलोत्पादन ) यांचे खाजगी सचिव
९. कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापिठ, परभणी
१०. कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापिठ, अकोला
११. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापिठ, राहुरी, जि. अहमदनगर
१२. कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापिठ, दापोली, जि. रत्नागिरी
१३. डॉ. वाय.एस.पी. थोरात, माजी अध्यक्ष, नाबार्ड, फ्लॅट न.३७०२३७, वा मजला, टॉवर-४ स्ट्राटा, प्लॅनेट गोदरेज, ३०, के.के. मार्ग, सातरस्ता जवळ, मुंबई-११
१४. अपर मुख्य सचिव ( कृषि व पणन ) कृषि, व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. सचिव ( पदुम ) कृषि, व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. सचिव ( मृद व जलसंधारण) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. सचिव ( ग्रामविकास) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१८. सर्व विभागीय आयुक्त

१९. कृषि आयुक्त , महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ जादा प्रतीसह
२०. आयुक्त, सहकार, महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२२. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२३. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२४. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
२५. महालेखापाल महाराष्ट्र -१ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ) मुंबई
२६. महालेखापाल महाराष्ट्र -२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ) नागपूर
२७. सर्व जिल्हाधिकारी
२८. संचालक ( विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे (५ जादा प्रतीसह)
२९. संचालक ( पणन) सहकार विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
३०. संचालक ( समाज कल्याण ) महाराष्ट्र राज्य, पुणे
३१. संचालक, रेशीम उद्योग, पुणे- मुंबई रस्ता, शासकीय दुध डेअरी समोर, पुणे -०३
३२. संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३३. संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
३४. सर्व संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, म.रा. पुणे
३५. संचालक ( लेखा व कोषागारे) मुंबई
३६. डॉ.आर.बी.देशमुख, माजी कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी राज बंगलो ४६ वृंदावन सेक्टर ए/बी को.ऑ.हौ.सो. पंचवटी पाषाण, पुणे-४११००८
३७. श्री. भास्करराव गायकवाड, कृषि विज्ञान केंद्र, बाभळेश्वर, जि.अहमदनगर
३८. श्री .शहाजी बापू पाटील, माजी आमदार,मु.पो. सांगोला जि.सोलापूर
३९. श्री.माणिकराव मोतीराम जगताप,नवेनगर,शासकीय वसाहती जवळ,महाड,जि .रायगड
४०. श्री. मानसिंग पवार, अध्यक्ष महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, इंडस्ट्रीज ॲण्ड ॲग्रीकल्चर, मुंबई
४१. श्री. अनंत घारड, आरपीटीएस रोड,लक्ष्मीनगर, नागपूर
४२. श्री. विजय बोराडे, शेतीतज्ञ,मराठवाडा शेतीसहाय्य मंडळ औरंगाबाद, C/O अजय इंजिनिअरिंग कॅम्पस ५४२/१४/ अदालत रोड, औरंगाबाद
४३. श्री. उध्ववराव आसाराम खेडकर, मु.पो.शिवणी, ता.जि.जालना
४४. श्री.सुरेश बाळासाहेब धुमाळ (प्रगतशील शेतकरी) मु. पो.करंजखोप,ता. कोरेगाव, जि. सातारा
४५. श्री. अंकुशराव जयसिंगराव जाधव, रा. नांदगिरी-खेड, ता.कोरेगाव, जि.सातारा
४६. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
४७. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, खोपोली, ता.खानापूर, जि.रायगड

४८. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, गेट क्रमांक ४, शहाजीनगर, लाईन बाजार, कोल्हापूर.

४९. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, बुलडोजर युनिट, शिवाजीनगर, पोस्ट ऑफीस जवळ, चऱ्होली, पुणे.

५०. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, संभाजी चौक, उंटवाडी रोड, नाशिक

५१. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, शहानूर मिया, दर्गा रोड, औरंगाबाद

५२. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,तपोवन रोड,अमरावती

५३. प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, बंगला क्रमांक ६२१/, धरमपेठ,नागपुर

५४. सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

५५. सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

५६. सर्व जिल्हयांचे जिल्हा कोषागार अधिकारी

५७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

५८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

५९. सर्व विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य

६०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय,विधानभवन, मुंबई (२प्रती)

६१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई

६२. उप सचिव (नियोजन विभाग) , मंत्रालय, मुंबई

६३. उप सचिव (व्यय-१)/अर्थसंकल्प-१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६४. सर्व सहसचिव / उप सचिव /अवर सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

६५. सहाय्यक संचालक (लेखा-२) कृषि आयुक्तालय, पुणे

६६. लेखाधिकारी (अर्थसंकल्प) कृषि आयुक्तालय, पुणे

६७. निवड नस्ती ( कार्यासन २-अे )